संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई या पदावर <u>पदोन्नती देण्याबाबत</u>

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक**
**शासन आदेश क्रमांक-पदोनि १११६/प्र.क्र.०६/का.१४२७,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १० एप्रिल, २०१७.

<u>वाचा</u> :- सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. ईएसबी-१११७/प्र.क्र.२/१३, दिनांक २१.०३.२०१७

**<u>शासन आदेश</u> :-**

संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय सुधारित पे बँड ३७,४००-६७,०००+ ग्रेड पे रु.८,९००/- या रिक्त पदावर, आस्थापना मंडळ क्र.१ च्या दिनांक ९.०३.२०१७ रोजीच्या शिफारशीनुसार श्री. प्र. दि. सोहळे, अपर संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांची पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येत आहे. सदर नियुक्ती ही खाली नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून तदर्थ तत्वावर करण्यात येत आहे :-

अ) पदोन्नतीचे पद महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील असल्याने सदर निवडसूचीस/पदोन्नतीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने नियमित केल्यानंतर पदोन्नतीच्या पदावर सेवाज्येष्ठता व अन्य सेवाविषयक लाभ मिळण्यास श्री. प्र. दि. सोहळे हे पात्र ठरतील.

ब) श्री. प्र. दि. सोहळे, अपर संचालक यांच्याविरूद्ध विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही.

क) वरील पदोन्नती तदर्थ व मा.उच्च न्यायालय येथे प्रलंबित असलेली रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ (स्टॅम्प क्र.७२५६/२०१५) (महाराष्ट्र राज्य विरुध्द श्री.विजय घोगरे व इतर) तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणामध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०४१०१०३५४९१६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae4435 9c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2017.04.10 15:21:35 +05'30'

**( प्रियांका रं. छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री / मा.मंत्री (नियोजन) / मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव.
२) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

३) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने).
५) सर्व विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय,
६) सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
यांना विनंती करण्यात येते की, श्री.प्र.दि.सोहळे, अपर संचालक यांच्या तदर्थ पदोन्नतीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेसाठीचा प्रस्ताव त्वरित सादर करावा.
१२) श्री.प्र.दि.सोहळे, अपर संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१३) सह संचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय,
कोकण विभाग / पुणे / नाशिक / नागपूर / औरंगाबाद / अमरावती.
१४) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय,
कोकण विभाग / पुणे / नाशिक / नागपूर / औरंगाबाद / अमरावती.
१५) सामान्य प्रशासन विभाग (का.१३), मंत्रालय, मुंबई.
१६) सर्व सह सचिव / उप सचिव /विशेष कार्य अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) लेखाधिकारी (लेखा शाखा), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई (२ प्रती).
१८) कार्यासन अधिकारी (का.१४१७/का.१४२६), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) निवड नस्ती